सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत- पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्या., चौंडी,ता. जामखेड जि.अहमदनगर

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शाभाभा-११२५/प्र.क्र.१५/टेक्स-१ (ब)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २० मार्च, २०२५.

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दि.११.८.१९९३
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-११९७/प्र. क्र.१९३/ टेक्स-१, दि. २४.३.१९९९.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-११०५/प्र. क्र.३८/ टेक्स-१(अ), दि. १५.६.२००६.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-३३१६/प्र. क्र.८१/ टेक्स-१(अ), दि. १०.७.२०१७.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-३३१६/प्र. क्र.४१ / टेक्स-१(अ), दि. ३०.०७.२०२१
६. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगी- २०२४/प्र.क्र.३०३/योजना-२, दिनांक २८.०८.२०२४
७. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगी- २०२०/प्र.क्र.७३/शिक्षण, दिनांक ०३.०९.२०२४
८. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगि/२९२४/प्र.क्र.२११/योजना-२ दिनांक ०४.१०. २०२४
९. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगि/२९२४/प्र.क्र.२११/योजना-२ दिनांक २२.०१. २०२५
१०.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगी-२०२४/प्र.क्र.२८१/योजना-२ (शिकाना)दि.२०.१२.२०२४ व समक्रमांकाचे शुध्दिपत्रक दि.२८.०१.२०२५
११. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, : सूतगी-२०२४/प्र.क्र.२११/योजना-२, दि.२२.०१.२०२५
१२.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, : सूतगि/२०२४/प्र.क्र.२८१ /योजना-२ (शिकाना), दिनांक ३०.०१. २०२५
१३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि. १२.०२.२०२५
१४.आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांचे पत्र क्र. कार्या ६(१)/सूतगि/शाभाभा/पुण्यश्लोक चौंडी,ता.जामखेड /१३२/२०२५, दि. १०.०३.२०२५

**<u>प्रस्तावना</u> :-**

इतर मागास बहुजन कल्याण या विभागाने महाराष्ट्र सहकारी संस्था नोंदणी अधिनियम, १९६० अंतर्गत नोंदणी झालेल्या कापूस उत्पादक क्षेत्रातील सहकारी सूतगिरणीस प्रत्येकी २५,००० चात्यांच्या सूत गिरणीसाठी कर्ज व भाग-भांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून १:९ (५:४५:५०) या प्रमाणात राज्यातील भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या सहकारी सूत गिरण्यांना भाग-भांडवल मंजूर करण्याबाबात शासन निर्णय दिनांक ०३.०९.२०२४ निर्गमित केला आहे.इतर मागास बहुजन कल्याण विभागाने शासन निर्णय दिनांक ०४ ऑक्टोबर, २०२४ अन्वये पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्यादित, चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या सूतगिरणीची शासकीय अर्थसहाय्यासाठी १:९ (५:४५:५०) या प्रमाणात भागभांडवल मंजूर करण्यासाठी निवड केली आहे. सदर सूतगिरणीची नोंदणी दि. ०७.०२.२०२४ रोजी करण्यात आलेली असून, नोंदणी क्र. ANG/SPM/CT-०८ आहे. सूतगिरणीचे कार्यक्षेत्र अहमदनगर जिल्हयातील जामखेड आणि कर्जत तालुक्यापुरते मर्यादित आहे. इतर मागास बहुजन कल्याण या विभागाच्या शासन निर्णय दि. २२.०१.२०२५ अन्वये या सूतगिरणीच्या रु.८०९०.०० लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस मंजूरी देण्यात आली आहे. सदर सूतगिरणीस रु.२०.०० कोटी शासकीय भागभांडवल मंजुर करणे बाबतचा शासन निर्णय दि.२० डिसेंबर,२०२४ रोजी इतर मागास बहुजन कल्याण या विभागाने निर्गमित केलेला आहे. तथापि, इतर मागास बहुजन कल्याण या विभागाच्या शासन निर्णय दि.२२.०१.२०२५ अन्वये राज्यातील भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या सहकारी सूतगिरण्यांची अर्थसहाय्यासाठी निवड करणे व त्याअंतर्गत राज्यातील भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करणे हा विषय वस्त्रोद्योग विभागाकडे हस्तांतरीत केला असून यानुषंगाने सदर सूतगिरणीस इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत मंजूर करण्यात आलेले रु.२०.०० कोटी शासकीय भागभांडवल दि.३०.०१.२०२५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे वस्त्रोद्योग विभागाकडे वर्ग करण्यात आले आहेत. वस्त्रोद्योग विभागाच्या दि.३०.०७.२०२१ च्या शासन पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्यादित, चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या सहकारी सूतगिरणीस पहिल्या टप्प्यातील अनुज्ञेय शासकीय भागभांडवल रूपये १८२०.२५ लाख मंजूर करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्यादित, चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या सूतगिरणीस पहिल्या हप्त्याचे शासकीय भागभांडवल रूपये १८२०.२५ लाख (अठरा कोटी वीस लाख पंचवीस हजार फक्त) इतकी रक्कम शासकीय भागभांडवल मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर शासकीय भागभांडवल शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८३/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि. २४.३.१९९९ (अ.क्र.५ वगळून), शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगी-

२०२०/प्र.क्र.७३/शिक्षण, दिनांक ०३.०९.२०२४, शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगि/२९२४/प्र.क्र.२११/योजना-२ दिनांक ०४.१०. २०२४, शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. सूतगी-२०२४/प्र.क्र.२८१/योजना-२ (शिकाना)दि.२०.१२.२०२४ व समक्रमांकाचे शुध्दिपत्रक दि.२८.०१.२०२५ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच शासकीय भागभांडवलासंदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) या सूतगिरणींकडून, शासन निर्णय दि.११.०८.१९९३ व दि.२४.०३.१९९९ मधील अटी व शर्तींचे पालन होत आहे, याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी खात्री करावी.

२) शासकीय भागभांडवलाच्या वसुलीबाबत दि.२४.०३.१९९९ रोजीच्या शासन निर्णयातील अ.क्र.५ मध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून त्यानुसार सूतगिरणीने भागभांडवलाचा पहिला हप्ता स्विकारल्यानंतर ५ वर्षांनी किंवा सूतगिरणी सुरु झाल्यानंतर ३ वर्षांनी यापैकी जे आधी घडेल तेव्हापासून उचल केलेल्या भागभांडवलाची परतफेड १/१५ प्रमाणे सुरु करण्यात येईल आणि असे न केल्यास त्यावर दरसाल दर शेकडा १२% प्रमाणे व्याज आकारण्यात येईल.

३) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी या सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

४) या सूतगिरणीसंदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी.

५) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी पुढील ३ महिन्यांत या सूतगिरणीच्या विद्यमान संचालक मंडळाकडून प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत रकमेच्या ५% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण मिळवावे. जोपर्यंत असे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही तोपर्यंत प्रस्तुत वितरीत रक्कम सूतगिरणीस खर्च करता येणार नाही तसेच तोपर्यंत या आदेशाद्वारे मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही, असे बंधन आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी काटेकोरपणे व तातडीने कार्यवाही करावी.

६) या आदेशानंतर या सूतगिरणीच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळाने शासकीय भागभांडवलाच्या ५% इतके वैयक्तिक मालमत्तेचे तारण भरल्याशिवाय नवीन संचालक मंडळ अस्तित्वात येणार नाही. पुर्वीच्या संचालक मंडळाने काही गैरव्यवहार केला नसेल किंवा त्यांच्या विरुध्द गुन्हा दाखल झाला नसेल तरच नवनियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच पूर्वीच्या संचालक मंडळाचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल, अशी सुधारणा संस्थेच्या By-Laws मध्ये करण्याची कार्यवाही आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

७) या सूतगिरणीच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री

आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

८) या सूतगिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

९) या सूतगिरणीने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

१०) प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च सूतगिरणी स्वनिधीतून करील या अटीवर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी तशी कार्यवाही करावी.

११) या सूतगिरणीच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी. निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये, याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी खात्री करावी.

१२) या सूतगिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच शिल्लक रकमेचा सूतगिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

१३) या सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण करावे.

१४) या सूतगिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण करावे.

१५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४ /प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६ व शासन निर्णय क्र. भांखस २०१७/प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१६) या सूतगिरणीची उभारणी विहित कालमर्यादेत पूर्ण करावी. सूतगिरणीने प्रकल्प पूर्ण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात शासन निर्णय दि.१५.०६.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

१७) दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

१८) इतर मागास बहुजन कल्याण या विभागाने राज्यातील भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या सहकारी सूत गिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्याबाबतचा शासन निर्णय क्र. सूतगी- २०२४/प्र.क्र.३०३/योजना-२, दिनांक २८.०८.२०२४ व राज्यातील भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या सहकारी सूत गिरण्यांना भाग-भांडवल मंजूर करण्याबाबात शासन निर्णय क्र. सूतगी- २०२०/प्र.क्र.७३/शिक्षण, दिनांक ०३.०९.२०२४ निर्गमित केलेले आहेत. उपरोक्त

शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती यांचे तंतोतंट पालन सूतगिरणीने केले आहे याची शहानिशा आयुक्त ,वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

१९) या सूतगिरणीच्या सर्व सभासदाने त्यांचे आधार कार्ड नंबर लिंक करणे बंधनकारक राहिल.

२०) सदर सूतगिरणी उभारण्यासाठी ५:४५:५० या आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सूतगिरणीने ५% सभासद भागभांडवल उभारणे बंधनकारक असून सदर सभासद भागभांगभाडवलाची रक्कम सूतगिरणीच्या प्रयोजनाव्यतिरक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी खर्च करता येणार नाही. तसेच शासनाकडून सूतगिरणीला मंजूर करण्यात येणाऱ्या ४५% शासकीय भागभांडवलाच्या रक्कमेचा विनियोग करताना सूतगिरणीने ५०% इतर मागास बहुजन कल्याण विभाग अथवा वित्तीय संस्थेकडून कर्ज म्हणून मंजूर करुन घेतलेली असणे आवश्यक आहे. शासकीय भागभांडवलापोटी प्राप्त रक्कमेचा विनियोग करताना इतर मागास बहुजन कल्याण विभागाकडून/ वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाचाही विनियोग त्याच प्रमाणात करणे गिरणीवर बंधनकारक राहील.

२१) या सूतगिरणीस मिळालेले अर्थसहाय्य हे सूतगिरणीचा प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे सूतगिरणीवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एकरकमी वसूल करण्यात येईल. तसेच अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

२२) प्रकल्प अहवालानुसार मान्य किंमतीनुसार त्या त्या बाबींकरिता विहित मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च सूतगिरणी स्वनिधीतून करील याची दक्षता आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी घ्यावी.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाची रक्कम रूपये १८२०.२५ लाख (अठरा कोटी वीस लाख पंचवीस हजार) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्यादित, चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या सूतगिरणीच्या स्टेट बँक ऑफ इंडिया शाखा-हळगांव ता. जामखेड जि अहमदनगर खाते क्र.:- ४२५६४२७५८६८,IFSC Code-SBIN०००७७३९ यामध्ये RTGS द्वारे जमा करण्यात यावी.

४. इतर मागास बहुजन कल्याण विभागाने सदर योजनेसाठी मागणी क्रमांक-झेडजी-४-मुख्य लेखाशिर्ष ४२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण यांवरील भांडवली खर्च, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०१) भाग भांडवली अनुदान, (०१) (०४) भटक्या जमाती (क) प्रवर्गातील सभासदांच्या सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग-भांडवली अंशदान, कार्यक्रम- ४२२५ २१४१ हे नविन लेखाशिर्ष तयार केले आहे. सदरहू सूतगिरणीस शासकीय भागभांडवलापोटी देय असलेली रक्कम अदा करण्यासाठी नविन लेखाशिर्ष ४२२५२१४१ खाली सद्यःस्थितीत निधी उपलब्ध नसल्याने विभागाच्या मागणी क्रमांक-झेडजी-४. प्रधानशिर्ष ४२२५ अंतर्गत वसंतराव नाईक विजाभज विकास

महामंडळास भागभांडवली अंशदान (आणि विमाप्र साठी योजना) (४२२५ १९२२) व महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्ग वित्त व विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४२२५ १९३१) उपलब्ध असलेला प्रत्येकी रु.१०.०० कोटी प्रमाणे एकूण रु.२०.०० कोटी इतका निधी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्या., चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या धनगर समाजाच्या सहकारी सूतगिरणीस शासकीय भागभांडवलापोटी शासन निर्णय दि.२०.१२.२०२४ अन्वये सूतगिरणीस मंजूर करण्यात आला होता.तथापि, राज्यातील भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करणे हा विषय वस्त्रोद्योग विभागाकडे हस्तांतरीत केला असून यानुषंगाने सदर सूतगिरणीस इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत मंजूर करण्यात आलेले रु.२०.०० कोटी शासकीय भागभांडवल दि.३०.०१.२०२५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे वस्त्रोद्योग विभागाकडे वर्ग करण्यात आले आहेत.

वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१२.०२.२०२५ अन्वये “३२-अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास नियोजन व वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली असून वित्त विभाग शासन निर्णय दि.२५.०७.२०२४ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सुचीमधील असलेल्या मुद्दयांची पूर्तता या प्रकरणी होत आहे.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१०.०५.२०१६ मधील परिच्छेद- अ नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार- “३२ अंशदाने” या बाबीखाली खर्च करण्यास नियोजन व वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली असून या बाबीखालील अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

२) मागणी क्रमांक-झेडजी-४. प्रधानशिर्ष ४२२५ अंतर्गत वसंतराव नाईक विजाभज विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (आणि विमाप्र साठी योजना) (४२२५ १९२२) व महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्ग वित्त व विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४२२५ १९३१) उपलब्ध असलेला प्रत्येकी रु.१०.०० कोटी प्रमाणे एकूण रु.२०.०० कोटी इतका निधी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्या., चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या धनगर समाजाच्या सहकारी सूतगिरणीस शासकीय भागभांडवलापोटी शासन निर्णय दि.२०.१२.२०२४ अन्वये सूतगिरणीस मंजूर करण्यात आलेले शासकीय भागभांडवल दि.३०.०१.२०२५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे वस्त्रोद्योग विभागाकडे वर्ग करण्यात आले आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- पहिल्यांदाच भागभांडवल देत असल्याने लागू नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही- या योजनेखाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे- सहकारी सूतगिरण्या ह्या स्थानिक स्वराज्य संस्था या प्रकारात मोडत नसल्यामुळे सदर मुद्दा या प्रकरणी लागू होत नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे- सहकारी सूतगिरण्या ह्या वैयक्तिक लाभार्थी या प्रकारात मोडत नसल्यामुळे सदर मुद्दा या प्रकरणी लागू होत नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी दि.१६.११.२००२ अन्वये स्थापित व तदनंतर दि.२४.०२.२००५, दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत दि.१६.११.२००२ अन्वये स्थापित व तदनंतर दि.२४.०२.२००५, दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा- उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ व शासन निर्णय क्र. भांखस २०१७/ प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी, असा उल्लेख या शासन निर्णयामध्ये करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी- निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये याबबात आयुक्त वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी, असा उल्लेख या शासन निर्णयामध्ये करण्यात आला आहे.

६. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रूपये १८२०.२५ लाख (अठरा कोटी वीस लाख पंचवीस हजार फक्त) इतक्या शासकीय भागभांडवलाचा खर्च मागणी क्रमांक- झेडजी-४. प्रधानशिर्ष ४२२५ अंतर्गत वसंतराव नाईक विजाभज विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (आणि विमाप्र साठी योजना) (४२२५ १९२२) व महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्ग वित्त व विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४२२५ १९३१) उपलब्ध असलेला प्रत्येकी रु.१०.०० कोटी प्रमाणे एकूण रु.२०.०० कोटी इतका निधी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्या., चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या धनगर समाजाच्या सहकारी सूतगिरणीस शासकीय भागभांडवलापोटी शासन निर्णय दि.२०.१२.२०२४ अन्वये सूतगिरणीस मंजूर करण्यात आलेले रु.२०.०० कोटी शासकीय भागभांडवल दि.३०.०१.२०२५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे वस्त्रोद्योग विभागाकडे वर्ग करण्यात आले असुन या रक्कमेतून सदर खर्च करण्यात यावा.

७. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रूपये १८२०.२५ लाख (अठरा कोटी वीस लाख पंचवीस हजार फक्त) इतकी रक्कम पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्यादित, चौंडी, ता. जामखेड, जि. अहमदनगर या सूतगिरणीच्या नावाने अधिदान व लेखा अधिकारी

कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन सूतगिरणीच्या स्टेट बँक ऑफ इंडिया शाखा-हळगांव ता. जामखेड जि अहमदनगर खाते क्र.:- ४२५६४२७५८६८,IFSC Code-SBIN०००७७३९ मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. श्रीकृष्ण पवार, उपसचिव (वस्त्रोद्योग), (V०००९), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय,नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९७/२०२५/व्यय-२ दि.१९.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१३२०११२४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHITRA RAVINDRA BISEN

Digitally signed by CHITRA RAVINDRA BISEN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f789a84db3cd4420e2db86c40df943d84a7873bde6b53430a5e3b150b091368e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0BD6EA041CD6F49090B004C64DAAE9708BF029C76F9B139C454C2A8EA66C7EA3, cn=CHITRA RAVINDRA BISEN
Date: 2025.03.20 13:21:11 +05'30'

**( चित्रा बिसेन )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (४ प्रती).
५. अवर सचिव, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. कार्यासन अधिकारी (व्यय-२ / अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. आयुक्त, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. प्रादेशिक उपायुक्त, वस्त्रोद्योग, छत्रपती संभाजीनगर
११. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अहिल्यानगर.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती).
१५. व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया शाखा-हळगांव ता. जामखेड जि अहिल्यानगर
१६. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१.
१७. अध्यक्ष, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सहकारी सूतगिरणी मर्यादित, चौंडी, ता. जामखेड, जि. अहिल्यानगर
१८. निवड नस्ती (टेक्स १ ब).